विमाने, ती वियाने - आज सत्य सृष्टीतली खेळणी करून सोडीत आहेत! शिल्प, वाणिज्य, कृषि, कलाकुसरी सर्व व्यवसाय इकडच्याहून तिकडे शतपटीने पकर्ष पावलेले आहेत. अर्थात् जातिबद्ध व्यवसायबंदी तोडल्याने ब्राह्मण, राजन्य, वाणिज्यादि गुणांत, शक्तीत नि व्यवसायात राष्ट्र अपकर्ष पावत नसून उलट गुणनिष्ट व्यवसाय स्वतंत्रतेनेच ते भरभराटू शकते, हे आता प्रयोगसिद्ध झालेले आहे.

भट नि भंगी!!

जन्मजात जातिभेदाच्या उच्छेदनार्थ अत्यंत अवश्य असलेल्या या व्यवसायबंदीच्या उच्चाटनाचे काम अशा रीतीने आज बहुतांशी झालेलेच असल्यामुळे आणि कोणी कोणताही व्यवसाय केल्यास त्याची जात त्यास आडवी येत नसल्यामुळे त्याच प्रकरणी जातिभेदाशी आपले फारसे भांडण उरले नाही, जर अजून कुठे व्यवसाय बंदी काही प्रमाणात आडवी येत असेल, तर ती अस्पृश्यांच्या प्रकरणी मात्र येते. पण त्याचा विचार स्पर्शबंदीच्या प्रकरणी असल्यामुळे, इथे त्याचा केवळ उल्लेख तेवढा करून ठेवणे पर्याप्त आहे. अस्पृश्यांतही आता ती चांभार-महार-दिकांच्या परंपरागत व्यवसायात तितकी बंदी राहिली नाही. चांभाराचे धंदे, दुसऱ्या जाती काही अंशी- जोडे, बूट विकण्याची दुकाने चालविण्याच्या नि चामड्याचे मोठे नवीन धर्तीचे सामुदायिक कारखाने चालविण्याच्या प्रकरणी तरी करतातच नि चांभार, महार गुणानुरुप शाळामास्तरही होऊ शकतात. व्यवसायबंदी कडकपणेच जर कुठे सापडली तर ती इकडे अस्पृश्यांत भंग्याच्या धंद्यात मात्र सापडते आणि तिकडे स्पृश्यांमध्ये भटांच्या! भंग्यांचे काम इतर जातीतील कुणी करू इच्छित नाही. भटाचे काम इतर जातीतील कोणास करू देत नाहीत. त्यामुळे या दोन धंद्यांचे मात्र त्या दोन जातीस अगदी 'एकस्व' (मोनॉपली) मिळाल्यासारखे झाले आहे! दुसरे कोणीही आपल्या जातीचे काम करीत नाही. ही निश्चिती असल्याने भंगी हा कलकत्त्यासारख्या प्रचंड कॉर्पोरेशनलादेखील वाकवू शकतो. मग साध्या घरवाल्यांची कथा काय? एक वेळ नगरसंस्थेच्या अध्यक्षाने संप केला तरी मोडता येईल, दहा अर्ज त्या जागेसाठी लगेच येतील. पण भंग्याने का संप केला की, त्याच्या मागण्या मान्य करण्यावाचून तो मोडण्याचे दुसरे साधन सापडणे कठीण जाते! कारण दुसरा कोणी त्याचे काम करणारच नाही! तीच गोष्ट भटाची. भट म्हटला की, तो ठराविक जातीचा, वृत्तीचा नसेल तर धर्मसंस्कार व्हावा तसा झाला नाही अशी रुखरुख भटापेक्षा यजमानालाच जास्त लागते! व्यवसायबंदी जर कुठे मोडायची अजून बाकी असेल, तर ती ह्या दोन प्रकरणी होय!

पैकी भंग्यांची खोड अशी मोडली पाहिजे

भंग्याचे काम कोणी करणार नाही ही जाणीव भंग्यांच्या जातीस त्या धंद्याचे 'एकस्व' (मोनॉपली) हाती राखून ठेवण्यास समर्थ करते. तसा कोणचाही निर्बंध (कायदा) नाही. यास्तव काही काल जातिभेद तोडू इच्छिणारांनी तत्वासाठी म्हणून भंगीकाम करून दाखविले पाहिजे. प्रथम सेनापती बापट, नंतर महात्मा गांधी, अप्पाराव पटवर्धन प्रभृति काही ठळक पुढाऱ्यांनी तो पायंडा पाडला आहेच. मागे एकदा कलकत्यास भंग्यांचा मोठा संप होऊन सारं नगर घाण साचून हतबुद्ध झाले असता शेकडो भद्र तरुणांनी (सभ्य वंशांतील तरुणांनी) आपापल्या आळीतून नि विभागांतून भंग्यांचे काम करण्यास आरंभिले आणि त्याचा परिणाम संप मोडण्याच्या कामी चांगला झाला. 'उच्च' मानलेल्या जातीनीच हा धंदा हाताळला - केवळ तत्वाकरिता का होईना की, भंग्यांच्या जवळपासच्या 'अस्पृश्य' जाती तो करण्यास पुढे येतात हाही अनुभव आहे. कारण प्राप्तीच्या दृष्टीने पूर्वास्पृश्यांच्या हाती असलेल्या धंद्यात आज तरी भंग्यांचा धंदाच भरभराटीचा आहे. मुलांनासुद्धा एका कुटुंबातील बायका-पुरुष, नोकर म्हणून नोंदवून घेऊन भंग्याचे एकेक कुटुंब महिना पन्नास साठ रुपये मिळवीत असते! तेव्हा काही सुशिक्षित तरुणही जर ह्या धंद्यात काही काळ जाणूनबुजून पडले, तर मामलेदार कचेरीतील कारकुनीपेक्षा नि शाळा-शिक्षकांतील प्राथमिक नोकरीपेक्षा दुप्पट पगार सहज मिळू शकेल.

एका बाजूने भंग्याचे काम प्रत्यक्ष करणारे प्रचारक पुढे यावे नि दुसऱ्या बाजूने तितके जास्त करवत नाही, अशा इतर सुधारकांनी भंगी काम करीत असलेल्यांना इतर कोणत्याही मनुष्याप्रमाणे समानतेने वागवावे. प्रत्यक्ष आचरणात स्वतः तसे वागणाऱ्या पाचपन्नास सुधारकांचा गट जरी निर्भयपणे काम करू लागला तरी या प्रकरणी समाजाची सहस्र वर्षांची, भंग्यांस अत्यंत नीच मानणारी धार्मिक भावनाही किती झटकन बदलू शकते त्याचे आश्चर्य वाटण्याइतके प्रत्यंतर, उदाहरण हवे तर, गेल्या चार वर्षांत रत्नागिरीस बघावयास मिळते. भंग्यांची मुले शाळेत सरमिसळ बसतात, भंगीकाम संपताच भंगीमंडळी अखिल हिंदू उपाहारगृहात प्रत्यही दुपारी, संध्याकाळी, ब्राह्मण, वाणी, मराठा प्रभृति अनेक नागरिकांसह सरमिसळ चहाचिवडा उपाहार खात, हसतखेळत बसलेली दिसतात. कीर्तनकार भंगी हजारो लोकांसमक्ष देवळाच्या सभामंडपात कीर्तन करतात, ब्राह्मणादिक महिला माळाफुले त्या भंगी कीर्तनकारास अर्पितात नि ब्राह्मणादि शेकडो नागरिक कीर्तनपरंपरेप्रमाणे त्याच्या पाया पडून प्रदक्षिणा घालतात. जी भंगीण दहा वाजता मळाचा डबा घेऊन घरून गेली, तीच अकरा वाजता स्नान करून सुवसने लेवून सहस्रभोजन समारंभी म्हणून

जेवावयास देवळात येते नि शेकडो प्रतिष्ठित त्रैवर्णिक स्त्रिया तिच्यासह सरमिसळ जेवतात. असे प्रसंग अनेकदा घडत आहेत, ज्या रत्नागिरीत सात वर्षांपूर्वी भंगी स्त्रियांस नुसते कुंकू लावावयास मोठ्या कष्टाने अवघ्या पाच त्रैवर्णिक मुली मिळाल्या, तिथे आता यात्रा उत्सवी देवळादेवळांतून सहस्र स्त्रियांच्या थव्यात भंगिणी सरमिसळ वावरतात, कुंकू लावतात, लावून घेतात, सभांतून निर्विशेष समतेने एकत्र बसतात! तीच रुढी होत आली आहे!

तेव्हा समाजाला अत्यंत हितकारक नि अपरिहार्य असे भंगीकाम हे नीचपणाचे द्योतक नाही. तो धंदा करणारा समाजात इतर धंदेवाल्यांप्रमाणेच स्वच्छ नि शुद्ध असल्यास समतेने संव्यवहार्य असतो असे स्वतःच्या वर्तनाने प्रत्येक सुधारकाने प्रत्यही दाखविले पाहिजे. म्हणजे त्या धंद्यातही इतर जाती पडतील नि व्यवसायबंदी जी दोन धंद्यातच अजून जातवार उरलेली आहे, ती भंग्यांपुरती तुटेल. राहता राहिला भट.

पण भटाची खोड मोडायची तर प्रथम यजमानांची खोड मोडली पाहिजे! कारण वास्तविक पाहता निदान आजतरी भट हा जर समाजाच्या डोक्यावर चढला आहे असे कोणास वाटत असेल तर त्याने हे लक्षात ठेवावे की, तो त्याच्या घरची धूर्तपणाची शिडी आणून काही तसा आमच्या डोक्यावर चढलेला नाही. तर आम्हीच आमच्या भाबडेपणाची शिडी त्याला देऊन आपल्या डोक्यावर चढवून घेत आहोत! भट हा खरोखर पाहता एक निरुपद्रवी प्राणी आहे. तो जोवर पोलिसाचे सहाय्य घेऊन आज आमच्या घरात बळाने घुसत नाही आणि तोवर आम्हीच त्याच्यामागे आमंत्रणावर आमंत्रणे धाडून त्याची पायधूळ आमच्या घरात झाडली जाईतो समाधान पावत नाही तोवर तो दोष भटाचा नसून आम्हां यजमानांचाच आहे. भटाच्या नावाने सांज सकाळ बोटे मोडणारे अनेक ‘समाजिस्ट’ नि ‘सुधारक’ लग्न-मुंज, श्राद्धपक्ष, गौरी-गणपतीचा दिवस उजाडला की, भटजीकडे जे हेलपाटे घालतात, तो येत नाही म्हणून त्यावर जे चडफडतात, दोन वाजेपर्यंत उपाशी राहतात पण भटाने पूजा सांगितल्यावाचून अन्नाचा घास जो त्यांस गिळवत नाही, त्या त्यांचा भाबडेपणातच भटशाहीचे बळ आहे, भटाच्या दर्भात नव्हे. जोवर यजमान हा भाबडेपणा सोडणार नाही, तोवर भटशाहीस लाख शाप दिलेत तरी भट हा असाच डोक्यावर चढलेला असणार. यजमानाची ही खोड सुटली नाही, तोवर भटाची खोडही मोडता यावयाची नाही. हे आजचे भट बदलाल तर ते उद्याचे डोकीवर चढतील!

कारण भट म्हणताच प्रथम ब्राह्मण भट जरी चटकन डोळ्यापुढे येतो तरी गुरव, गुरू, जंगम, फार काय महारांत देखील महार भट आहेतच! ही सारी अब्राह्मण असली तरी भटशाहीच आहे. भटाचा मुलगा तो भट, त्यास तो गुण असो नसो, त्याचे केवळ

वंशपरंपरा वतन ते, त्याच्यावाचून दुसऱ्या जातीस वा कुळास वा व्यक्तीस ते संस्कार करण्याचा हक्कच नाही. अशी स्थिती आज तरी जेथे जेथे असेल तेथे तेथे त्या भाबड्या समाजास परवडते, ती हवी आहे - म्हणूनच ती टिकून आहे.

यास्तव भटाची जातवार व्यवसायबंदी मोडण्याचा मुख्य उपाय म्हणजे संघटनाभिमानी सुधारकाने प्रथम आपले संस्कार ठराविक जातीच्या वा कुलाच्या भटावाचून होऊच शकत नाहीत, हा स्वतःचा भाबडेपणा सोडून प्रत्यक्ष आचरणात ती सुधारणा व्यवहारली पाहिजे. प्रथमतः अनेक संस्कारात भट बोलावूच नये. पूजा, पाठ, गौरी, गणपती, सोयर-सुतक, संक्रात, द्वादशी, दसरा, दिवाळी प्रभृति शेकडो प्रसंगी भटावाचून काही एक अडणार नाही. स्वतः पोथी वाचावी किंवा शुद्ध मराठीत ते शब्द नि भाव व्यक्तवून ज्याची त्याने पूजा करावी. पारणे फेडणे तर आजच्या उपयुक्त संस्थांस दक्षिणा द्यावी. श्राद्धपक्षास पितरांचे गुणसंकीर्तन करून त्यांच्या नावे आज हिंदू राष्ट्रास बलवत्तर करणाऱ्या कार्याकडे काही दान देत चलावे किंवा तो दिवस राष्ट्रसेवेस, पितृभूसेवेस म्हणजे तो पितृसेवेस अर्पून स्वतः कोणते तरी राष्ट्रकार्य करावे. पितृभूच्या - पितृराष्ट्राच्या प्रित्यर्थ झटण्याहून नि झुंजण्याहून पितृऋण फेडण्याचे अधिक श्रेयस्कर साधन ते कोणते असणार? लग्ने नैर्बंधिक नोंदीने (लीगल रजिस्टरने) करावी. भटास प्रथम हातापाया पडून बोलावता का नि मग त्याच्या नावे रडता का? भटास 'शहा' म्हणू नका की भटशाही संपली!

ते होत नसेल आणि उपाध्याय वर्ग हवाच असेल तर आमचे आर्यसमाजीय बांधव आज कित्येक वर्षे त्यांच धर्मोपाध्याय वर्ग ज्या पद्धतीने निर्मितात ती पद्धती अवलंबावी. श्रुतिस्मृतियक्षज्ञप्रक्रियेत ज्याची जी परीक्षा उतरेल त्या पदवीचाच नव्हे, तर याज्ञिकी चालविण्याचा अधिकार अधिकृत प्रमाणपत्र देऊन अर्पिला जावा. मग ती कोणत्याही जातीची वा कुलाची व्यक्ती असो! आज डॉक्टर जसा जातपातीनेच ठरत नसून ज्यास डॉक्टरीचे ज्ञानार्जित प्रमाणपत्र मिळेल तो डॉक्टर होतो; तसाच यापुढे वैदिक, याज्ञिक, उपाध्याय भट, भिक्षुक! श्रीमान श्रद्धानंदांनी स्थापिलेल्या गुरुकुलातून असलेले अस्पृश्य जातीचे ब्रह्मचारी विद्यार्थी आज वेदालंकार तर्कतीर्थ विद्यानिधी याज्ञिक, उपाध्याय होत आहेत. त्यांस ब्राह्मणतर्कतीर्थाचा, विद्यानिधींचा, याज्ञिकांचा, भटांचा मान मिळाला पाहिजे. उपाध्यायाचा व्यवसाय करता आला पाहिजे, तेव्हा भटच हवा असेल तर प्रत्येक सुधारकाने तो जातवार न निवडता गुणावर निवडावा. म्हणजे आज सुतारकी वा वैद्यकी जशी सर्व जातीना उघडी झाली आहे, तशी याज्ञिकी किंवा भटकीही जातिनिष्ट न ठेवता गुणनिष्ठ झाली पाहिजे.

खरोखर व्यवसाय बंदी ज्या दोनच व्यवसायात आज जातिबद्ध आहे, त्यांपैकी एक वेळ भंग्यांची व्यवसायबंदी तोडणे किंचित् कठीण जावो; पण बिचाऱ्या भटाची

व्यवसायबंदी तोडणे कठीण जाऊ नये. कारण भटास बोलावले नाही की संपले; आणि त्यास न बोलावले तर भंगी न आला तर अडते तितके देखील अडणार नाही. स्वतः भंगी होणे एक वेळ आजच्या समाजभावनेप्रमाणे अपमानार्ह होईल; पण स्वतःचा भट स्वतःच होणे हे सर्वस्वी सन्मानार्हच समजले जाईल. देवास मराठी समजतही असलेच पाहिजे. तेव्हा प्रत्येक सुधारकाने स्वतःचे सारे धर्मसंस्कार पूजापाठ, व्रतवैकल्ये स्वतः मराठीत करावी किंवा संस्कृतज्ञ बी. ए; एम्. ए. असलेल्या कोण्या ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, महार, चांभार प्रभृति विद्वान सदाचारी हिंदुसेवक मित्रांकडून करवावी किंवा आर्यसमाजीय पद्धतीप्रमाणे गुणनिष्ट नि जातिनिर्विशेष अशा निघालेल्या पुरोहित विद्यालयांतून योग्यतेचे प्रमाणपत्र मिळालेल्या नव्या उपाध्यांकडून करवावी.

व्यवसायबंदी तोडण्याच्या कार्यी, अशा रीतीने सुधारकांस, फारच थोडे करावयाचे आहे. तोंडपाटिलकी सोडून जो 'इतर करोत न करोत; मी माझ्यापुरता तरी ही सुधारणा प्रत्यही प्रत्यक्षपणे उचारून दाखविणार' असे वागेल तोच खरा सुधारक, आता जन्मजात जातिभेदाच्या उच्छेदनार्थ स्पर्शबंदी प्रभृति उरलेल्या प्रकरणी काय केले पाहिजे, ते या लेखाच्या उत्तरार्धात विवेचिले जाईल.

* * *

# जन्मजात जातिभेद मोडायचा म्हणजे काय करावयाचे?

(उत्तरार्ध)

वर याविषयी जी मुख्य विधेये (पॉईंटस्) प्रतिपादिली त्यांचा या लेखातील भागाशी अगदी निकट संबंध असल्यामुळे आणि त्या मुख्य विधेयकांची पुनरुक्ति, त्यांचा ठसा वाचकांच्या मनावर पक्का बिबविण्याच्या कामी उपयुक्तही असल्यामुळे पहिल्या लेखांकातील ती विधेये एकंदर विषयाच्या अनुसंधानार्थ आरंभीच पुन्हा एकदा विवेचिणे अवश्य आहे.

आजचा जातिभेद हा 'जन्मजात' म्हणून म्हणवीत असला तरी तो निव्वळ 'पोथीजात' आहे! जन्मतःच प्रकटणाऱ्या कोणत्याही रूपगुणधर्माच्या भिन्नतेने आजच्या जाती निरनिराळ्या ठरू शकत नाहीत. तर अमक्या छापाच्या गटात अमुक जन्मला म्हणून तो श्रेष्ठ किंवा स्पृश्य आणि अमुक कनिष्ठ वा अस्पृश्य 'मानला' जावा असे पोथीत सांगितले आहे, यासाठी तो तसा नुसता मानला जात आहे. आजचा जातिभेद हा जन्मजात नसून निव्वळ पोथीजात आहे!

आजच्या जातिभेदाची ही जन्मजात म्हणून नुसती मानल्या गेलेल्या उच्चनीचतेची विषारी नांगी मोडून टाकली गेली की, मग त्या त्या जाति वा उपजाती नुसत्या नावाने आणखी काही काळ जरी अशाच राहिल्या तरी मोठीशी हानि होणार नाही. कुळाचे आडनाव जसे भिन्नभिन्न असते, परंतु त्या कुळाला प्रत्यक्ष गुणाने उपार्जिल्यावाचून कोणताही अधिकार भोगता येत नसल्यामुळे त्या भिन्न नावाच्या गटांमुळे, जसा कोणताही परस्पर मत्सर वा राष्ट्रीय विघटना आज होऊ शकत नाही. तशीच ब्राह्मण, क्षत्रिय, साळी, माळी, महार, चांभार प्रभृति विभिन्न नावे त्या त्या जातीच्या गटांची यापुढेही जरी चालली आणि जरी त्यांच्या विशिष्ट परिषदा, संघ, सण नि संस्कार जातवारीने यापुढेही चालत राहिले, तरीही- त्यांना प्रत्यक्ष व्यवहारात कोणतेही हक्क प्रकट गुणांवाचून उपभोगिता आले नाहीत तर, आणि जर यच्चयावत् अधिकार नि व्यवसाय सर्व जातीत समानतेने उघडलेले असले तर अशा घरगुती गटांनी राष्ट्रीय संघटनेची हानि होण्याचा संभव म्हणण्यासारखा उरणार नाही. उलट अपरिहार्य म्हणून उरणाऱ्या ह्या अशी नांगी तोडलेल्या जातवार गटांचा उपयोगही राष्ट्रीय संघटनेला तसाच करून घेता येईल की, जसा तालुका, जिल्हा, इलाखा प्रभृति भौमिक गटांचा उपयोग राज्याच्या संघटनेला करून घेता येतो.

ज्ञातिपरिषदाही राष्ट्रीय दृष्ट्या विघटक न होता संघटकही होऊ शकतील, जर-

त्या त्या परिषदा नि ज्ञातीय संस्था खाली दिलेली मुख्य सूत्रे आपल्या मूळ उद्देशपत्रिकेत दोन ध्रुवाप्रमाणे अढळपणे अंकितील! प्रत्येक ज्ञातिपरिषदेची पहिली प्रतिज्ञा, पहिले सूत्र, हे असले पाहिजे की, आम्ही कोणत्याही इतर ज्ञातीस केवळ जन्मामुळेच, जन्मतःच हीनतर मानीत नाही वा उच्चतर मानीत नाही, आणि दुसरी प्रतिज्ञा ही की, 'आमच्या जातीतील व्यक्तीस जे गुण प्रकटपणे नि प्रत्यक्षपणे आढळून येतील त्यावरून आमची पात्रापात्रता ठरविली जावी. आम्हांस अधिष्ठान मिळावे, इतरांप्रमाणेच त्या आमच्या गुणाचे चीज व्हावे इतरांप्रमाणे त्या गुणांच्या संपादनास नि संवर्धनास आम्हांसही मोकळीक असावी; पण प्रत्यक्ष गुणांच्या कसोटीतून निराळ्या असे कोणत्याही पक्षपाती पोथीजात ज्ञातिनिष्ठेच्या वशिल्याने इतर कोणतेही न्याय्य अधिकार लुबाडण्याची आमची मनीषा नाही. प्रत्येक जातिसंघाने ह्या दोन स्पष्ट प्रतिज्ञांच्या पायांवर आपली ज्ञातिसंघटना केली असता ती इतर ज्ञातीच्या हानीस कारण होणार नाही. इतकेच नव्हे, तर त्या दोन सूत्रांच्या कक्षेत येणाऱ्या त्या त्या जातीची शिक्षण-आरोग्य-शक्ती-संपन्नता-सहकार्याची वाढ ही आपल्या अखिल हिंदू राष्ट्राच्या संघटनेस साहाय्यकही होण्याचा पुष्कळच संभव आहे. जन्मजात कुलांचे गट जसे असतात, तसेच हे जन्मजात जातीचे गटही आपल्या हिंदू राष्ट्राच्या विघटनेसच आजच्यासारखे कारणीभूत न होता संघटनेसही सहाय्यक होतील. आमच्या राष्ट्रीय महासेनेच्या त्या निरनिराळ्या उपसेना आपल्या परंपरांच्या छावण्यांतून गटागटांनी संघटित नि सज्ज होत राहिल्या तर ते फारसे अनिष्ट नाही. राष्ट्रीय ध्वजाखाली राष्ट्रीय ध्येयासाठी राष्ट्राचे रणशृंग फुंकले जाताच, त्या त्या उपसेना झटकन एकत्र करून त्या महासैन्याच्या सुसंगत हालचाली करण्यास ही त्यांची गटागटांनी केलेली पूर्वसज्जता उपयोगी पडल्यावाचून राहणार नाही. जोवर ह्या जाति मोडल्या नाहीत तोवर त्यांच्या विभिन्न परंपरेच्या आवडीनिवडीचा संघर्ष नि विरोध कमीत कमी हानिकारक करवून घेण्याचा आजच्या परिस्थितीत जो एकच मार्ग आहे तो वरील दोन सूत्रे हाच होय.

या दृष्टीने पाहता रत्नागिरीच्या चित्पावन संघाचे उदाहरण काहीसे उल्लेखनीय आहे. या संघाने आपल्या उद्देशपत्रिकेत ही वरील दोन सूत्रे गोविली असून नुकत्याच झालेल्या त्यांच्या वार्षिक साधारणसभेतही त्यांचा सबळ पुरस्कार केला आहे. 'हा ज्ञातिसंघ आपल्या हिंदू राष्ट्राच्या कोणत्याही ज्ञातीस केवळ जन्मतःच उच्च वा नीच मानीत नाही. प्रत्यक्ष प्रकट होणाऱ्या गुणावगुणांवरूनच ज्याची त्याची पात्रता ठरविली जावी. आणि कोणत्याही ज्ञातीस वा व्यक्तीस अंगी ते ते प्रकट गुण नसता केवळ जन्माच्या वशिल्यानेच कोणतेही विशिष्टाधिकार वा विशिष्ट हानि भोगता येऊ नयेत

वा भोगावी लागू नये असेच या संघाचे ब्रीद आहे, अशी ग्वाही त्या संघाच्या बहुतेक वक्त्यांनी त्या सभेत जी दिली ती स्तुत्य आहे. जर तो संघ त्याचे हे लिखित ब्रीद तितक्या प्रामाणिकपणे व्यवहारातही उतरवील आणि वैश्य, सारस्वत, मराठा, भंडारी प्रभृति ज्ञातिसंघही जर तेच ब्रीदवाक्य शिरोधार्थ करतील, तर या ज्ञातिपरिषदा नि ज्ञातिसंघ अखिल हिंदुराष्ट्राच्या राष्ट्रीय विघटनेस कारणीभूत होण्याचे भय फारसे उरणार नाही, तर उलट हिंदू संघटनेच्या महत्कार्यास ते झाल्यास उपकारकही होऊ शकतील.

जन्मजात जातिभेदाचे चार पाय

तेव्हा आज हिंदू राष्ट्रास अत्यंत अपायकारक झालेल्या जन्मजात जातिभेदाचा उच्छेद करण्यासाठी आपणास केवळ मानीव असलेल्या ह्या पोथीजात उच्चनीचतेला उचलून धरणाऱ्या आणि व्यक्तीच्या प्रत्यक्ष नि प्रकट गुणांचा विचार न करता, तिला कोणतेतरी विशिष्टाधिकार वा विशिष्ट हानी चिकटविणाऱ्या ज्या ज्या रुढी प्रचलित आहेत त्यांचे त्यांचे उच्चाटन आपणांस केले पाहिजे. अशा रुढीत अत्यंत प्रबळ, व्यापक नि हिंदू राष्ट्राच्या संघटनेस, मूलतःच घातक होणाऱ्या रुढी चार आहेत, त्या म्हणजे, व्यावसायबंदी, स्पर्शबंदी, रोटीबंदी आणि बेटी बंदी!

(१) व्यवसायबंदी - तोडण्यासाठी आज काय केले पाहिजे याची सविस्तर चर्चा मागील लेखांकात केली आहे. जन्मजात जातिभेदाचा अत्यंत प्रबळ आधार ही व्यवसायबंदीची रुढीच होती. पण हिंदू राष्ट्राच्या सुदैवाने ती आज आधीच जवळजवळ उच्छिन्नलेली आहे. वाटेल त्या जातीच्या मनुष्यास आज वाटेल तो व्यवसाय करता येतो. त्यात त्याच्या गुणानुरुप त्यास प्रतिष्ठाही मिळते. निर्बंधाची (कायद्याची) त्याला कोणतीही अटक नाही, इतकेच नव्हे, तर अगदी थोडे अपवाद वगळल्यास त्याला त्याच्या जातीचीही आडकाठी उरली नाही. ब्राह्मण, हा शिंपी, सोनार, डॉक्टर, वाणी इत्यादी वाटेल तो धंदा निर्बंधान्वये (कायदेशीर रीतीने) तर करू शकतोच, पण त्याच्या जातिनियमानुरुपही आज व्यवसायस्वातंत्र्यास आडकाठी उरली नसल्याने तो ते धंदे करुनही पुन्हा ब्राह्मणच्या ब्राह्मण राहू शकतो. तीच स्थिती इतर वर्णांची. पूर्वास्पृश्याविषयीही निर्बंधाची अटक उरलेली नाही. आज कोणताही अस्पृश्य कोणताही स्वतंत्र धंदा करू लागला -वाणी, सुतार, डॉक्टर, बॅरिस्टर, शिक्षक झाला- तरी जातीच्या निमित्ताने निर्बंध (कायदा) त्यास अडवीत नाही. समाजाचा अप्रत्यक्ष उपद्रव मात्र त्यास अजून सोसावा लागतो. पण त्याला त्याने तोंड दिले पाहिजे आणि वेळी नैर्बंधिक साहाय्य घेऊन त्या उपद्रवाची खोड मोडली पाहिजे. व्यवसायबंदी आज जर

खरोखर कुठे तुटली नसली तरी ती भट नि भंगी ह्या दोन, धंद्यातच काय ती होय. त्यातही निर्बंध आड येत नाही, पण रुढी येते! या दोन, अपवादांस उच्छेदिणे एवढेच काय ते सुधारकाचे कार्य व्यवसायबंदी तोडण्याचे प्रकरणी उरलेले आहे. ते त्यांनी केलेच पाहिजे आणि त्यांनीच केले पाहिजे. पैकी भंग्यांच्या धंद्याचे एकत्व (मोनॉपली) तोडण्याचे दोन उपाय : एक हा की, भंग्यास प्रत्येक प्रसंगी सन्मानाने वागवावे. त्यास हेतुतः प्रकटपणे बरोबर हातात हात घालून हिंडावे. आपल्या घरी सर्वसाधारणपणे स्पृश्य येतात तेथवर भंग्यासही बेखटक येऊ द्यावे. समाजाच्या लक्षात ठळकपणे येईल अशा थोड्या दिखाऊपणाने त्यास प्रत्येक स्थळी सन्मानावे, म्हणजे भंग्याचा धंदा हलकट, ही भावना नाश पावून इतर जाति वेळ प्रसंगी त्या धंद्यात पडण्यास कचरणार नाहीत. आणि दुसरा उपाय हा की, सुधारकांनी प्रसंगविशेषी जाणूनबुजून सार्वजनिकपणे भंग्याचे काम करावे. वेळी काही दिवस तीच नोकरी करावी. भंग्यांच्या संपांत तर सुशिक्षित सुधारकांनी हेतुतः भंग्याचे सारे काम स्वतः करून नगरग्रामे स्वच्छ ठेवावी. स्वतःचा भंगी नाही कोण? त्रिकाळ स्नान करणारा स्नातकही आपले भंग्यांचे काम आपणच करतो. मोठा चक्रवर्ती राजा झाला, तरी तो बाकीची यच्चयावत कामे चाकरांकडून करवू शकेल; पण स्वतःच्या भंग्याचे काम मात्र त्याचे त्यालाच करावे लागणार! ते काम काही तो राजाही दुसऱ्या कोणाकडे काही केल्या सोपवणार नाही! ही शिकवण सुधारकांनी तोंडी तर दिलीच पाहिजे, पण ती स्वतः प्रकटपणे सार्वजनिक भंगीकाम प्रसंगविशेष वरचेवर मोडण्याचे दाखवून आचरली पाहिजे.

भटाची व्यवसायबंदी मोडण्याचे उपाय असेः- एक हा की, ब्राह्मण सुधारकाने शक्य तो भट बोलावूच नये. आपल्या घरची व्रते, सत्यनारायण, पूजापाट सारी स्वतः करावी. वेळी लग्नेदेखील नैर्बंधिक नोंदीने पार पाडावी, म्हणजे ब्राह्मण सुधारकांना सहभोजनादि सुधारणांत प्रकटपणे भाग घेतांना जी ठराविक अडचण पडते की, 'नाही तर भट येणार नाही!' ती मुळातच नाहीशी होईल. दुसरा उपाय हा की, ब्राह्मणेतर सुधारकांनी भटास चक्क अट घालावी की, 'तुम्ही आमच्या घरी वेदोक्त संस्कार चालवाल तरच यावे. गौरीगणपतीप्रभृति प्रत्येक प्रसंगी भटाकडून वेदोक्त पूजा करून घेतल्या की, वेदोक्तबंदी तुटलीच. आपली वृत्ती बुडविण्यापेक्षा मोठमोठ्या शेठजींच्या वा सरदार, श्रीमंत अब्राह्मणांच्या घरी वेदोक्त चालविण्यास मान्य होणारे भट मिळतात ही प्रयोगसिद्ध गोष्ट आहे. उदाहरणार्थ, प्रत्यक्ष रत्नागिरीस ती घडत आहे. पण ब्राह्मणेतर सुधारकही भटास ही अट घालण्यास वचकतात! तिथे भटापेक्षा अशा वाचाळ सुधारकांचाच दोष अधिक असे म्हणणे भाग आहे. शक्य असेल तिथे भटांची व्यवसायबंदी तोडण्यासाठीच काही अब्राह्मण विद्वान सुधारकांनी हेतुतः भटकी शिकावी, गुरव, जंगम, जोशीप्रभृति अब्राह्मण भटांचीही भटशाही अशाच उपायांनी

मोडली पाहिजे. भटांची भटशाही ही सर्वस्वी यजमानाच्या भाबडेपणातच आहे. त्यात भटाचा अपराध अगदी अल्प, हे सुधारकांनी केव्हाही विसरता कामा नये. त्यास उत्कृष्ट उपाय म्हणजे भट बोलावू नये हाच! साऱ्या भाबड्यांनी निरर्थक व्रतवैकल्यांच्या गौडबंगालास चाट देऊन लग्नादि सामाजिक विधि नैर्बंधिक कराराच्या स्वरुपात नैर्बंधिक नोंदीने पार पाडावे; सारी पूजाप्रार्थना स्वतःच्या भाषेत भक्तिभावाने स्वतःच करावी.

२) स्पर्शबंदी -- जन्मजात जातिभेदाचा दुसरा उपाय जो स्पर्शबंदी तो पहिल्या व्यवसायबंदीच्या पायासारखा आज जरी आधीच लुळा होऊन पडलेला नाही, तरी त्यावर चहू बाजूंनी आज टोल्यावर टोले लगावले जात असल्यामुळे तोही बराच अधू होत आला आहे. तरीही सुधारकांना अजून दहाबारा वर्षे तरी ही स्पर्शबंदी उखडून टाकण्यासाठी पराकाष्ठेचे प्रयत्न करावयास हवेत. स्पर्शबंदी ही व्यवसायबंदीप्रमाणे यच्चयावत हिंदू समाजाला भोवत नाही. 'स्पृश्य' समजल्या जाणाऱ्या वीस कोटी हिंदूंची ह्या ब्यादीपासून मुळातच सुटका झालेली असते. उरलेल्या तीनचार कोटी हिंदूंना मात्र जन्मतःच त्यांची स्वतःची उपजत प्रकृती घडधाकट असताही ह्या महारोगाचे विष समाजाकडून बळाने टोचण्यात येते आणि त्यांचे जीवन प्रत्यक्ष महारोग झालेल्या दुर्भाग्याहूनही दुर्भागी, दुर्धर, धिक्कृत नि अमंगळ करण्यात येते.

पण हा छळ 'स्पृश्य'च तेवढा अस्पृश्यांचा करतो असे नाही. तर 'अस्पृश्य' ही दुसऱ्या 'अस्पृश्या'चा असाच असह्य छळ करावयास सोडीत नाही. गावच्या विहिरीवर कावळे, कुत्री, बागडत असता, नि पाणी पित असता भर दुपारी तहानेने व्याकूळ झालेल्या महाराला त्या पाण्यास शिवता येत नाही. हे पाहून तो महार जेव्हा त्याला तेथून शिवीगाळ करून हुसकून देणाऱ्या ब्राह्मण मराठ्यांना 'राक्षस आहेत हे क्रूर' म्हणून शिवी देतो, तेव्हा तो ती शिवी देत नसून सत्य तेच सांगत असतो! पण महारवाड्यातल्या विहिरीवर भंगी जर तसाच तान्हेला, तशाच भर दुपारी, तसेच पाण्याला शिवू लागला तर तेच महार त्याच ब्राह्मणमराठ्यांसारखे, त्यासही शिवीगाळ करून हुसकवून देण्यास सोडीत नाहीत! ब्राह्मणांस 'पाजी' म्हणणारा महार स्वतःच भंग्याचा ब्राह्मण बनतो! भंग्याला तसेच छळण्याच्या 'पाजी'पणात रतिभरही कमी करीत नाही? नाशिकच्या राममंदिर सत्याग्रहाच्या वेळी महार मंडळी देवदर्शनाचा, आपला हिंदुत्वाचा न्याय्य हक्क बजाविण्यास गेली असता, देवातही अस्पृश्यतेची संस्था घुसवून, 'स्पृश्य' देव नि 'अस्पृश्य' देव असा भेद निर्मून, अस्पृश्यांच्या दर्शनाने देव विटाळू नये म्हणून जेव्हा काही भटजीशेटजींनी त्या महारांची टाळकी लाठ्यांनी सडकली तेव्हा सात्त्विक संतापाने जे महार चवताळले, त्यांनी हेही विसरता कामा नये

की, जर महार जातीच्या कोण्या मरीआईच्या मंदिरात देवदर्शनाच्या त्याच हिंदुत्वाच्या हक्कासाठी भंगी लोक जाऊ लागते तर, महारांनीही तितक्याच लांब पल्ल्याच्या लाठ्यांनी त्यांची टाळकीही तशीच सडकण्यास कमी केले नसते! अर्थात् स्पर्शबंदी तोडण्यासाठी केवळ 'स्पृश्य' सुधारकांनीच नव्हे, तर 'अस्पृश्य' सुधारकांनीही परस्परांशी सहकार्य करून प्रयत्नांची पराकाष्ठा केली पाहिजे. स्पर्शबंदी तोडण्याचे दायित्व 'स्पृश्या' इतकेच 'अस्पृश्यां'वरही आहे.

अशा लहानशा लेखात फुटकळ उपाय अशेषतः सुचविणे अशक्य. सर्व साधारण रूपरेखा आखणे नि दिग्दर्शनापुरते काही ठळक उपाय सुचविणेच काय ते शक्य यास्तव स्पर्शबंदी तोडण्याच्या कार्यक्रमाविषयी इतकेच सांगणे इथे पर्याप्त आहे की, अस्पृश्यता घालविणे म्हणजे दुसरेतिसरे काही नसून 'शिवणे' हेच होय. अस्पृश्योद्धार-- त्यांना शिक्षण, नोकऱ्या, घरे प्रभृति साहाय्य देणे हा देखील जातिभेदोच्छेदाचा विषय नव्हे. जातिभेदोच्छेदनाशी प्रत्यक्ष सबंध जन्मजात अस्पृश्यता तोडण्याशीच काय तो आहे. न शिवणे म्हणजे अस्पृश्यता अर्थात शिवणे म्हणजे अस्पृश्यता नाहीशी करणे. रोटीबंदी, बेटीबंदी, वेदोक्तबंदी प्रभृति इतर सुधारणा पुढच्या पायऱ्या त्या स्पृश्यांसही लागू असतात. अस्पृश्यांचा गट 'स्पृश्य' केला की, स्पर्शबंदी तुटली, अर्थात इतर नाना अल्पसंबद्ध वा असंबद्ध प्रश्नांची ह्या प्रश्नांशी गुंतागुंत केल्याने, स्पर्शबंदीची जी बेडी तोडणे एका बाजूने इतके दुर्घट कार्य वाटते तेच दुसऱ्या बाजूने इतके सोपे होऊन बसते. केवळ शिवायचे! की, जन्मजात जातिभेदाचा एक पाश खाड्दिशी उखडला जाउन ज्याच्या त्याच्या पुरते तरी चार कोटि हिंदुबांधवांस माणुसकीत आणून सोडण्याचे महत्कृत्य त्याचे त्याने पुरते केले म्हणून समजण्यास हरकत नाही. तरी रे हिंदुसंघटका, उठ आणि दुसरे कोणी काय हवे ते करो, तू तुझ्यापुरते या घटकेपासून हे व्रत धर की, जे बोट कुत्र्यामांजरास मी लावतो ते बोट मी माझ्या 'अस्पृश्य' धर्मबंधूस, माणसास, प्रत्यही लावल्यावाचून अन्नग्रहण करणार नाही. म्हण शिवेन!' आणि कोणत्या तरी अस्पृश्य धर्मबंधूस प्रत्यही, प्रकटपणे शिवून सगळ्यांना दाखीव! की तुझ्यापुरते तू अस्पृश्यतेच्या पापापासून हिंदू जातीस मुक्त केल्याचे पुण्य जोडलेस! सर्वसाधारण स्पृश्याला घरात आपण जितके येऊ देतो तितके अस्पृश्यांस येऊन द्यावे, ज्यांची भाड्याने देण्याची घरे असतील त्यांनी स्पृश्यांप्रमाणेच ती 'अस्पृश्यांनाही भाड्याने द्यावीत; ज्याच्या स्वतःच्या विहिरी असतील त्यांनी त्या स्पृश्याइतक्याच अस्पृश्यांना उघडाव्या. जाणूनबुजून प्रदर्शनास्तवच महार, भंगीप्रभृति धर्मबंधूस हातात हात घालून साधेल तितक्या वेळा मार्गाने बाजारांत, यात्रेत प्रकटपणे हिंडावे. थोडक्यात म्हणजे, जो कोणी अस्पृश्य भेटेल त्याला स्पृश्य समजूनच ते ते व्यवहार त्याच्याशी दिवसांतून एकदा तरी प्रगटपणे सगळ्यांदेखत केल्यावाचून

संध्याकाळ उलटू नये. 'अस्पृश्य' सुधारकाने त्याच्या 'खालच्या' अस्पृश्यास, तसेच व्रत धरून एकदा तरी दिवसातून स्पृश्यत्वाचा अधिकार देऊन शिवावे. चांभाराने धेडास, महाराने भंग्यास! संघटक सुधारकांपैकी जर प्रत्येकजणाने बोलघेवडेपणा सोडून असा करघेवडेपणा प्रत्यही आचरला, आपल्या पुरते तरी 'अस्पृश्यांस' पूर्वास्पृश्य करून सोडले, तरी देखील दहा वर्षाच्या आत अस्पृश्यतेचा मागमूसदेखील साऱ्या समाजांत आढळून येणार नाही. इतकी संघटक सुधारकांनी संख्या आजही पुष्कळ झालेली आहे.

अस्पृश्य सुधारकांनी आणखी एक व्रत व्यक्तिशः स्वीकारले पाहिजे. आज निर्बंधाने अनेक शाळा, कचेऱ्या, धर्मशाळा, विहिरी, वाहने, प्रभृति सार्वजनिक स्थानी अस्पृश्यतेचे उच्चाटन केले आहे, त्या साऱ्या नैर्बंधिक (कायदेशीर) सवलतीचा प्रत्यक्ष उपयोग प्रत्येक अस्पृश्य सुधारकाने हटातटाने करून त्या आत्मसात केल्या पाहिजेत. ही गोष्ट सध्या त्यातल्यात्यात सहज आहे. कारण त्यात निर्बंधाचे साहाय्य सुधारकांच्या बाजूस आहे. या कामी श्री. राजभोज बोर्डाच्या विहिरीवर अस्पृश्यांकडून प्रत्यक्षपणे पाणी भरविण्याची जी खटपट करतात आणि नागपूर प्रभृति प्रांती निर्बंधानुरूप उघडलेल्या तलाव प्रभृति स्थानांचा प्रत्यक्ष उपयोग करून घेण्याचा पायंडा जो तिकडील अस्पृश्य पुढारी चढाई करून वेळी सत्याग्रहानेही पाडीत आहेत तो प्रत्येक 'अस्पृश्या'ने जिकडे तिकडे अनुकारिला पाहिजे.

परंतु आज जे हे नैर्बंधिक अधिकार अस्पृश्यांस मिळालेले आहेत, त्या सर्वांत अत्यंत परिणामकारक अधिकार म्हणजे शाळांतून मुले सरमिसळ बसविण्याचा होय. हा अधिकार प्रत्येक अस्पृश्यांने तलाव विहिरीप्रभृतिच्याही आधी बजावावा. मुले प्रत्यही शाळेत स्पृश्यास्पृश्य भावना विसरावयास शिकली की, पुढच्या पिढीला धोबीप्रभृतिप्रमाणेच महारभंगीही पूर्णपणे नि सहजगत्या स्पृश्य वाटणारच वाटणार- केवळ सवयीच्या बळे! ते अस्पृश्य केव्हा तरी होते ह्याची आठवणही बुजेल लहानपणापासून सरमिसळ खेळीमेळीने वागत आल्याने! स्पृश्य मुलांशी - खोत, वकील, शेटजींच्या मुलांशी बरोबरीने प्रत्यही मांडीस मांडी भिडवून बसत आल्याने अस्पृश्य मुलांची राहणी सुधारते आणि अनेक प्रसंगी बुद्धीच्या चढाओढीत अस्पृश्य मुलांचा क्रमांक ब्राह्मणादिकांहूनही वर लागला असल्यामुळे एका बाजूस अस्पृश्यांचा आत्मविश्वास वाढतो, दुसऱ्या बाजूस स्पृश्यांचा अहंकार घटतो. आज शाळेत अस्पृश्य मुले सरमिसळ बसू लागली की, उद्या आपण होऊन त्या अस्पृश्यांचे 'पूर्वास्पृश्य' झालेच म्हणून समजावे! पुन्हा शाळांतून सरमिसळ बसण्याचे कामी सरकारी निर्बंध (कायदा) अस्पृश्यांचे बाजूसच असल्याने, मंदिरप्रवेशापेक्षाही अधिक परिणामकारक असताही हा उपाय अधिक सहजसाध्य ठरतो.

यास्तवच मंदिरप्रवेशाचा प्रश्न सध्या दुय्यम समजावा - शाळाप्रवेशाहून तरी! कारण मंदिराविषयी वहिवाट, वैयक्तिक मत्ता इत्यादी प्रत्येक प्रकरणी निर्बंध (कायदा) अस्पृश्यांच्या उलट जाणार हे ठरलेले. मंदिरप्रवेशाच्या प्रश्नावर चढाई करून त्यास सुरूंग लावण्याचा, कमीत कमी विरोधाचा नि जास्तीत जास्त परिणामाचा मार्ग म्हणजे रत्नागिरीच्या पतितपावन मंदिरासारखे एकेक अखिल हिंदू देवालय, जातिनिर्विशेष समानतेच्या पक्क्या पायावर प्रतिनगरी स्थापणे - तेच यशस्वी करून दाखविणे हाच होय. जुनी मंदिरे धडाधड उघडलीच पाहिजेत; उघडणारच पण ती त्यांच्यावर समोरून चढाई करून नव्हे, तर अखिल हिंदू देवालयांचा वा धर्मालयांचा सुरूंग त्याने मर्मस्थानीच भरून त्याच्या धडाक्यासरशी समाजाच्या भावनेतच क्रांति घडविल्याने होय. ह्या वर्षी पुढे मागे रत्नागिरीच्या जात्युच्छेदक आंदोलनाच्या प्रयोगाची प्रत्यक्ष फलश्रुति आम्ही एका लेखात स्वतंत्रपणे सांगू इच्छितो. त्यांत श्रीपतितपावनासारख्या ह्या अखिल हिंदुसंस्थेचे परिणाम ह्या प्रकरणी किती दूरवर होतात, ते स्पष्टविले जाईलच.

३) रोटीबंदी - जन्मजात जातिभेदांचे उच्चाटण जर आजच्या परिस्थितीत कोणत्या एखाद्या रुढींच्या उच्चाटणातच बव्हंशी सामावलेले असेल तर ते ह्या उच्चाटणातच होय. कारण व्यवसायबंदी तुटलेलीच आहे; स्पर्शबंदी ही सर्व हिंदुसमाजास लागू नसून अस्पृश्यांपुरतीच आहे. ती तुटतही आली आहे आणि रोटीबंदी तुटून महाराबरोबर ब्राह्मण जर जेवू लागला, तर तो स्पर्श करील की नाही हा प्रश्नच उरत नाही. उंटच गिळणारा सुपारीचे खांड गिळण्यास का कचरणार आहे? आणि बेटीबंदी ही रोटीबंदी तोडण्याइतकी का अवश्य नि कठिण नाही ते आम्ही पुढे सांगतच आहो. अशा रीतीने आजच्या जातिभेदाच्या या चार पायांपैकी जो पाय मुख्यत्वेकरून हाणताच हे धूड खाली कोसळणार आहे तो पाय रोटीबंदी हाच होय! आजच्या ह्या हजारो जाती एकमेकांपासून पृथक करणारे मुख्य नि सर्वगामी जिवंत लक्षण रोटीबंदी नि बेटीबंदी हेच होय. पैकी रोटीबंदी फार थोड्या प्रमाणात जात्युच्छेदनाच्या सार्वजनिक नि त्वर्य (अर्जंट) कार्यक्रमास आडवी येते. ती कशी ते पुढे पाहू. उरलेली रोटीबंदी तेवढी तत्काळ तोडलीच पाहिजे आणि ती तोडली की, जन्म जात जातिभेदात जो काही थोडा बहुत खरा जीव आज उरलेला आहे त्याच्या मर्मी मारक टोला बसलाच म्हणून समजावे.

रोटीबंदी तोडावयाचे साधनही विश्वास वाटू नये इतके सोपे आहे; नुसते जेवायचे! भिन्न जातीयां-बरोबर जेवायचे! की हा एवढा दुर्गम् दुःसाध्य वाटणारा जातिभेदाचा प्रचंड गड गडगडत कोसळलाच पाहिजे. जातिभेद एकत्र लढून जन्मात मरायचा नाही; पण एकत्र जेवताच तो ठिकच्याठिकाणी मरून पडतो. यास्तव प्रत्येक खऱ्या सुधारकाने

हे सूत्र वेशीवर टांगावे की, 'जे रुचेल नि पचेल ते वैद्यकीय दृष्ट्या योग्य त्या कोणत्याही मनुष्याने खावे, नि प्यावे!' तो हिंदू असो, मुसलमान असो वा अंदमानी असो-- कोणाबरोबरही खाण्याने, पिण्याने, सहभोजनाने वा सहपानाने, जात जात नाही! धर्म बुडत नाही! सहपान वा सहभोजन हा वैद्यकशास्त्रीय प्रश्न आहे. जातची जात किंवा धर्मचा धर्म भाताच्या पेजीच्या बुडबुड्यात बुडतो असे सांगणाऱ्या भाबड्या धर्मशास्त्रांचा नव्हे! आम्हांस जर कोणा संघटक सुधारकाने विचारले की, आजच्या स्वरूपात असलेल्या ह्या पोथीजात जातिभेदाचे मरण नक्की कशात आहे? तर आम्ही एका शब्दात अगदी प्रयोगसिद्ध सत्य म्हणून सांगू की -

सहभोजन! सहभोजन! सहभोजन!

या पोथीजात जातिभेदाचे मरण सहभोजनातच आहे. पण त्याच्या अटी पुढीलप्रमाणे :- अ) 'आम्हांस सहभोजनाचे तत्व मान्य आहे!' अशी वाचाळता करून प्रत्यक्षपणे सहभोजनात भाग घेण्यास कचरता कामा नये. आ) सहभोजनात इतर कोणी भाग घेवो वा न घेवो अन्य जातीचा एकच मनुष्य जरी मिळाला, तरी आपण आपल्यापुरते त्याच्याबरोबर जेऊन आपल्यापुरती रोटीबंदी तोडली पाहिजे. अ) ती जन्मजात केव्हा तरी एकदा तोडू, आता पुन्हा हेतुपुरस्सर कशाला? असे विचारीत पुन्हा उभ्या जन्मात सहभोजनात पाय न टाकणारे भिरुत्व वा सभ्यत्व कुचकामी समजून प्रत्यही प्रसंग आला तरी प्रत्यही सहभोजन केले पाहिजे. प्रत्यही ब्राह्मणभोजन करणारा जर अधिकच पुण्यशील समजला जातो तर प्रत्यही सहभोजन करणारा मात्र खट्याळ का समजला जावा? ई) प्रत्यक्ष सहभोजन प्रकटपणे --- जाहीर रीतीने --- झाले पाहिजे. नावे शक्य तो छापलीच पाहिजेत. इराण्याच्या दुकानात जसे अचानक 'भटजी' सापडतात आणि कॉलेजांतून वा कलेक्टर म्लेच्छांसह गुपचूप जेवणारे वकील वा पदवीधर उघडपणे आमच्या रोटीबंद आर्यसंस्कृतीचा उदोउदो करताना जसे गल्लोगल्ली आढळतात, तसेच मिथ्याचारी सुधारकही दुर्मिळ नाहीत! त्यांचा उपयोग काय? उ) प्रत्येक सहभोजनात शक्यतो अस्पृश्य मनुष्य अवश्य असावा. सहभोजनाची तीच खरी क्षारपरीक्षा (ॲसिड टेस्ट) आहे! नाही तर केवळ ब्राह्मणाबरोबर सहभोजने करण्यास हपापलेले, पण महाराबरोबर बसताच 'आज कोठा जड, दूध घेतो की थोडे!' अशी लटपटपंची करणारे समाजिस्ट काही थोडेथोडके भेटत नाहीत!

आम्ही अनुभवजन्य निश्चितीने सांगतो की, असे प्रत्यक्ष आचरण करणारे पाचशे संघटक सुधारक वारंवार सहभोजने करीत राहिले, तर पांच सहस्र वस्तीच्या नगरांतून, रोटीबंदीच्या रुढी उखडून टाकू शकतात. जेवणावारी जातिभेद मारला जातो. ते कसे हे लेखमर्यादेमुळे इथे पाल्हाळाने आम्ही सांगत बसत नाही- पाल्हाळ अवश्यही नाही. खऱ्या संघटक सुधारकांस आम्ही ग्वाही देतो की, तुम्ही आधी करून पहा. फळ न

मिळाले तर मग ह्यांचे समर्थन आम्हांस पाल्हाळाने विचारीत बसा. बहिष्कार? पडतीलच! पण पाचशे चिकाटीच्या सहभोजक सुधारकांवर बहिष्कार घालणारा पाच हजारांचा बहुजनसमाजही अंती मेटाकुटीस येतो. कारण बहिष्कार हे दुधारी शस्त्र. घालणारासही ते कापते. खरा सुधारक निश्चितार्थ असतो. बहुजनसमाज तसा नसतो. संख्येचे प्रमाण हे वरचे असेल तर. बहुजनसमाजच या रोटीबंदी प्रकरणी तेवढे बोलायचे तर - जर आज तितकासा मनःपूर्वक विरुद्ध नसल्यामुळे त्रास सोसण्याइतका चिवट राहत नाही आणि शेवटी त्याची दृष्टि मरून, त्यात त्याला काही विशेष चिडल्यासारखे वाटेनासे होऊन, ‘आगबोटीत विटाळ नाही हे शास्त्र जसे जन्मले तसे सहभोजनाने जात जात नाही हे शास्त्रही न कळत उमजते, पटते.

४) बेटीबंदी - जातिभेद मोडायचा म्हणतात सर्व साधारणतः बहुतेक लोकांना जो धक्का बसतो तो त्यामुळे बेटीबंदी तुटून प्रचंड घोटाळा उडणार ह्याच कल्पनेने होय! म्हणजे आता शेकडो ब्राह्मणांच्या मुली महारवाड्यांत कोंबायच्या नि चांभारांच्या मराठामोळ्यात घुसायच्या! अशी एक भयानक कल्पना जातिभेद मोडायचा म्हणताच लोकांसमोर उभी राहते! रोटीबंदी तोडून महारांच्या पंक्तीस जेवणाऱ्या ब्राह्मण सहभोजनांचादेखील त्यांना एक वेळ इतका धक्का बसत नाही; पण बेटीबंदी तोडण्याचे नाव काढताच ते अगदी घाबरून जातात! उलटपक्षी कित्येक सुधारक विशेषतः जहाल अस्पृश्य --- जातिभेद तोडायचा याचा अर्थ ब्राह्मणांच्या मुली आम्हांस दिल्या पाहिजेत, असाच नेमका ठासूनठासून सांगतात
पण वास्तविक पाहता त्या पहिल्याची भीती नि ह्या दुसऱ्याची आकांक्षा ह्या सारख्याच असत्य नि अतिरेकी आहेत. कारण बेटीबंदी तोडण्याचा अर्थ अमक्यांच्या मुली तमक्यांना ‘दिल्याच’ पाहिजेत, असा नाही. ब्राह्मणांच्या वा वाण्यांच्या मुली आम्हांस ‘दिल्याच’ पाहिजेत, असे म्हणणारे अस्पृश्यही त्या सौद्यांच्या प्रतिमूल्याचा प्रश्न निघताच धक्का खाऊन ‘नव्हे, नव्हे, दिल्याच पाहिजेत असे नव्हे!’ असे म्हणत चाचरू लागतात कारण त्यांसच ते प्रतिमूल्य परवडत नाही. जातिभेद मोडण्यासाठी ब्राह्मण - वाण्यांच्या शंभर मुली जर महारचांभारांस ‘दिल्याच’ पाहिजेत, तर त्याच अटीप्रमाणे महारचांभारांच्या शंभर मुली भंग्यास नि धेडासही ‘दिल्याच’ पहिजेत, म्हणून भंग्यांच्या वतीने मागणी घालण्याचा उशीर की, त्याच महार - चांभार जहालांस भीक नको पण कुत्रा आवर असे होऊन जाते. आणि तेही विवेकाची भाषा बोलू लागतात.

तो विवेक असा :- अमक्याने तमक्या मुली 'दिल्या' पाहिजेत ही भाषाच मूलतः असह्य नि आजतर अशक्य आहे! आजच्या मुली उपवर असणार, त्यांच्या वरांना दिवसेंदिवस मुख्यतः त्याच निवडणार. आम्हास 'देणारे' तुम्ही कोण म्हणून त्या आईबापास देखील जिथे हटकणार तिथे तिसऱ्या सोमाजीगोमाजीस कोण विचारतो? दुसरे असे की, महार, वाणी, बंगाली, मराठ्याने एखादे दिवशी क्षणभर शेजारी बसून सहभोजनांत जेवणे निराळे आणि भाषा, वेषभूषा, आचारआहाराने विभिन्न अशा एका राहणीतील मुलीला दुसऱ्या अगदी अपरिचित राहणीत जन्माची ढकलणे वा जावे लागणे हे निराळे! उद्या रोटीबंदी जरी अगदी निर्बंधाने (कायद्याने) तोडली, तरी देखील महाराष्ट्रीय ब्राह्मण मुलीला बंगाली ब्राह्मणाच्यादेखील घरी देणे हजारी नउशेनव्याण्णव अंशी परवडणार नाही, जुळणार नाही. कारण जातीचा विचार सोडला, तरी लग्नासारख्या आजच्या शरीरसंबंधात सोयीचा विचार तरी केला जाणारच जाणार. त्या मराठीत नि बंगाली ब्राह्मण वधूवरांच्या आवडीनिवडीही जुळणे दुर्घट. मराठी ब्राह्मण वधू त्या बंगाली ब्राह्मणाच्या घरी, आपल्या सासरी जाताच ती माणसे बंगाली बोलणार, ही मराठीत उत्तरणार; कानडीने केला मराठी भ्रतार! एकाचे उत्तर एका नये! पुढे स्नाने होऊन साड्या पालटू लागताना त्या बंगाली सासू-जावा बिन काष्ट्याने लुगडी नेसणार; हिला तसेच बिनकाष्ट्याने सगळ्यांसमोर वावरणे जिवावर येणार! सैपाकाला ती सासू बसली की हिला सांगणार, 'येवढे चार मासे सोलून दे पाहू.' जेवताना ती बंगाली ब्राह्मणांच्या रीतीप्रमाणे माशांची आमटी भुरक भुरक भुरकणार! ही मराठी ब्राह्मणाची मुलगी त्या मासोळी जेवणाच्या वासासरशी ओक ओक ओकणार! परत वरचेवर माहेरी यावे तर एका वर्षाचा येत्याजात्या भाड्याचा खर्च लग्नाएवढा होत राहणार!! ही गोष्ट जशी एका प्रांतातील मुली स्वजातीय परप्रांतीयांच्या घरी दिल्याची, तशीच गावातल्या गावातही महाराची मुलगी मराठ्यांच्या वा चांभाराची महाराच्या घरी देण्याची. अंतर, भाषा, राहणी इत्यादी सोयी---गैरसोयीमुळे नि आवडीनिवडीमुळे रोटीबंदी तत्वतः तुटली तरी, एका जातीच्या मुली शेकड्याने अन्य जातीत ढकल्या जातील अशी जी भीती वाटते, ती तसे कधीही घडणे शक्य नसल्यामुळे अगदी काल्पनिक आहे. इंग्लंड नि स्कॉटलंड यामध्ये जातवारीची बेटीबंदी नाही. पण ह्या सोयीगैरसोयीमुळेच हजारी एक इंग्लिश मुलगी लंडनला पिढ्यान पिढ्या राहत असता स्कॉटलंडात दिली जाते की नाही, याची शंकाच आहे. लंडनच्या मुली बहुधा लंडनच्या आसपासच आपले वर निवडणार. तीच स्थिती जातवार बेटीबंदी तत्वतः तुटली तरी पुण्याची, मद्रासची, कलकत्त्याची, रत्नागिरीची, तिथल्या मुली बहुधा आपल्या शेजारच्या गावात नि स्वजातीतच आपले सासर शोधणार, आपले स्वयंवर निवडणार; तेव्हा बेटीबंदी तत्वतः तुटली तरी प्रत्यहीच्या

व्यवहारात अकस्मात् म्हणण्यासारखी उलाढाल होणे शक्य नाही. मग बेटीबंदी तोडायची याचा अर्थ काय? त्याचा अर्थ हा की-

बेटीबंदी तोडणे म्हणजे, अमक्या जातीच्या मुली तमक्या जातीत 'दिल्याच' पाहिजेत अशी आज्ञा नसून, जर कोणा हिंदूने प्रेमशील, सुप्रजननक्षमता प्रभृति वैवाहिक गुणानुकूल असा अन्य जातीचा हिंदू वधूवर निवडला तर, केवळ जात भिन्न एवढ्यासाठीच, तो विवाह निषेधिला जाऊ नये वा त्यायोगे त्या वधूवरांस पूर्णपणे सव्यहार्य समजण्यास हरकत असू नये, अशी एक अनुज्ञा आहे. अशी मिश्रविवाहाची अनुज्ञा जन्मजात जातिभेद मोडण्याच्या दृष्टीने नव्हे, तर शुद्धिचळवळ पचविण्यासही अत्यंत अवश्य आहे. हिंदू राष्ट्राच्या संघटनास उपकारक नि अपरिहार्य आहे.

बेटीबंदी तोडण्याची एक मर्यादा मात्र मनुष्यप्रगतीच्या सद्यस्थितीत नि हिंदू राष्ट्राच्या आजच्या विशिष्ट परिस्थितीत निरपवादपणे पाळणे अवश्य आहे, ती ही की, हिंदूने आपसांतील कोणत्याही जातीशी विवाह केला तरी चिंता नाही; पण हिंदुत्वाच्या कक्षेबाहेर जाऊन कोणीही मुसलमान ख्रिश्चनादिकांशी विवाह करता कामा नये. जोवर मुसलमान, मुसलमानच राहू इच्छितो तोवर हिंदूला हिंदुच राहिले पाहिजे. तिला वा त्याला हिंदू करून घेतल्यावाचून अहिंदूंशी विवाह करणे आपल्या हिंदू राष्ट्राच्या सामुदायिक हितास अत्यंत अनिष्ट आहे. ज्यावेळी ते दुराग्रही अहिंदु केवळ मनुष्यधर्मास भजू लागतील नि मुसलमानकी सोडून माणुसकीतच समावतील तेव्हा हिंदुही त्याच मनुष्यधर्माप्रमाणे मनुष्यामनुष्यांत कोणताही जातिधर्म, देशाचा भिन्नभाव मानण्याचे सोडून केवळ माणुसकीचे नाते तेवढं पाळतील. आज मात्र हिंदूंनो तसा भोळसटपणा करणे हेच माणुसकीच्या विरुद्ध आहे.

बाँबगोळ्यांनी नव्हे, बुंदीच्या लाडवांनी !

जर या दोन्ही लेखांकांत दिग्दर्शिलेला कार्यक्रम पुढे ठेवून प्रत्येक संघटक सुधारक, इतर कोणाची वाट न पाहता आपला आपण ह्या सुधारणांस स्वतःच्या प्रत्यहीच्या आचरणात व्यवहारू लागेल, प्रत्यक्ष तसे करू लागेल, तर जन्मजात जातिभेद ज्या अर्थी तो मोडायचा आहे त्या ह्या लेखात विशदिलेल्या अर्थी, उच्छेदिणे फारसे दुर्घट नाही. ज्याच्या त्याच्यापुरता तरी जातिभेद आजच्या आज तोडता येणारा आहे. त्यातल्या त्यात त्याचा आजचा जिवंत चालता पाय जी रोटीबंदी ती तर प्रत्येक सुधारकाने तत्काळ आणि सारखी तोडीत राहिले पाहिजे. सहभोजन हाच जातिभेदाच्या समंधास गाडणारा प्रबळ मांत्रिक! नुसत्या शास्त्राधाराच्या एरंडाच्या गुऱ्हाळाने तर तो जातिभेद मरणार नाही, पण प्रत्यक्ष शास्त्राधाराच्या नैर्बंधिक सक्तीसही तो मारणे दुर्घट, अनिष्टही. जसा मारावा तसा जर त्यास मारणे असेल, तर सुधारका, तू

तुझ्यापुरती रोटीबंदी तत्काळ तोडून टाक. किती सोपे हे साधन, ब्राह्मण नि महारांनी एकत्र बुंदीचे लाडू झोडावयाचे की जातिभेद मेलाच म्हणून समजा! जातिभेदाच्या ह्या अजिंक्य किल्ल्यास असाच शाप मिळालेला आहे की, तू शतकोशतके बाँबगोळ्यांच्या माऱ्यानेही ढासळणार नाहीस. पण शेवटी बुंदीच्या लाडवांचा मारा मात्र तुझा चक्काचूर उडवील!!

* * *

# हिंदूध्वज

"स भूमिम् विश्वतोवृत्चा अत्यतिष्टत् दशांगुलम्!" प्रत्येक ध्येयास, प्रत्येक समेष्टीस, प्रत्येक नवीन महत् कार्यास त्याचे रहस्य व्यक्त करणारे आणि त्याच्या स्फूर्तीने अंतःकरणास उद्दीहा करणारे असे जे त्यांचे विशिष्ट संस्कार आणि जी स्वतंत्र्य प्रतीके असावी लागतात. त्या सर्वांमध्ये त्या ध्येयाचा, समेष्टीचा किंवा महान विचारांचा द्योतक आणि प्रवर्तक असा जो त्याचा ध्वज तोच त्याचे प्रबलतम प्रतिक असतो.

एक वेष, एक राष्ट्र नि एक संस्कृति, एक रक्त, एक बीज, एक भूतकाळ आणि एक भवितव्य या अखंडनीय संबंधानी संबद्ध झालेल्या ह्या एक गटी बावीस कोटी हिंदू जातीच्या मान समेष्टीचा आणि तिच्या संघटनाच्या महत् कार्याचा हेतू आणि संदेश, बळ आणि तेज, अखिल मनुष्य जातीस व्यक्त करणारे प्रतिक म्हणजेच हा आमच्या हिंदू जातीचा अभिनव हिंदू ध्वज होय.

आम्हां हिंदूतील प्रांताप्रांताचे आणि पंथापंथाचे वैशिष्ट्यरूप आजवर अनेक भिन्न भिन्न ध्वज होत आले आणि त्यापैकी आजही त्या त्या प्रांतांत आणि पंथात पुष्कळ प्रचलीतही आहेत. मराठ्यांचा भगवा झेंडा आहे. रजपुतांचे दहा पांच केसरी आहेत. गुरख्यांचा सूर्यचंद्राकित ध्वज आहे. शिखांचे आणि जैनांचे, शैवांचे आणि वैष्णवांचे, आर्यांचे आणि अनार्यांचे - आमच्या या महान हिंदू जातीच्या प्रत्येक पंथाचे आणि प्रांताचे जे हे भिन्न ध्वज आहेत, ते ते आम्हा सर्वांस पूज्य आणि आदरणीय आहेतच. त्या त्या पंथांची आणि उपजातीची ती ती विशिष्ट ध्येये व्यक्त करीत ते सर्व ध्वज यापुढेही आमच्या निरनिराळ्या हिंदू भाषांप्रमाणेच त्या त्या भाषेत फडकत राहतील. परंतु प्रांताप्रांतातील त्या त्या हिंदू भाषासंघांत समन्वित करणारी आणि आम्हां अखिल हिंदूंची म्हणून गौरविलेली जशी गिर्वाण संस्कृत किंवा ही हिंदी प्राकृत आम्हां हिंदूंची जातीय भाषा आहे, हिंदू भाषा आहे त्याचप्रमाणे आमच्या वा पंथांच्या आणि प्रांतांच्या या विशिष्ट ध्वजांचे भिन्न भिन्न वैशिष्ट्य ज्यांत समन्वीत झालेले आहे आणि सर्व पंथ, प्रांत, वर्ण, जाति निर्विशेष असणारी आणि तरीही त्या सर्वांची महान पूर्णता असणारी ही जी आमची हिंदू जाती तिचा म्हणून जो एक महान केतू आहे. स्पृश्य वा अस्पृश्य ब्राम्हण वा अब्राह्मण, मराठी वा बंगाली, वैदिक वा अवैदिक, ज्यांचे ज्यांचे पितर या आसिंधु सिंधुपर्यंत पावन भूमीत पूर्वापार निवसत आले आणि म्हणूनच ही ज्यांची पितृभू आहे आणि त्याच पितरांचेच उदरी जन्मास येऊन आपला धर्मपंथ स्थापते झाले आणि म्हणूनच ही ज्यांची पुण्यभूमी ---धर्म-भूमी (Holy land) आहे ---त्या त्या हिंदू मात्रांची महान समेष्टी असणारी जी ही आमची

हिंदू जाती तिच्या जागतिक संदेशाचा, अंतर्हित मर्माचा आणि व्यावहारिक प्रवृत्तीचा जो द्योतक आणि प्रवर्तक आहे तो ध्वज म्हणजे हिंदू ध्वज होय. ज्या भगव्यावर एका बाजूस कुंडलिनी आणि दुसऱ्या बाजूस कृपाण अंकित आहे तो हा अभिनव हिंदुध्वज होय!

या हिंदू ध्वजाचा भारतीय राष्ट्राच्या हिंदू ध्वजांशी कोणचाही विरोध नाही. ती दोन्ही प्रतीके विभिन्न आणि तरीही संबद्ध अशी दोन स्वतंत्र प्रतीके आहेत. आणि आपापल्या कक्षेत आपापली कर्तव्ये करीत असतांही एकमेकांस पूरकच होणारी आहेत. हिंदी राष्ट्रीय ध्वज असताही ज्याप्रमाणे आणि ज्या प्रमाणांत धार्मिक वा सांस्कृतिक प्रकरणी ख्रिश्चनांचा "क्रॉस" किंवा मुसलमानांचा हरित अर्धचंद्र अंकित असलेले त्यांचे जातीय ध्वज अस्तित्वांत राहतीलच. त्याचप्रमाणे आणि त्याच प्रमाणांत जी २२ कोटी हिंदू जाति त्या हिंदी राष्ट्राची प्रबलतम घटक आहे. त्या हिंदू जातीच्या जातीय, सांस्कृतिक आणि धार्मिक संबंधांत हा हिंदुध्वज ही हिंदुध्वजाच्या गौरवाची आणि आकांक्षेची साक्ष देत राहील; स्फूर्ति होत राहील, प्रत्येक हिंदू हिंदी म्हणून राष्ट्रीय ध्वजास वंदन देईल. हिंदू म्हणून हिंदुध्वजास आपली प्राणपूजा अर्पण करील.

हिंदू ध्वजाचा स्वीकार आणि स्वागत

पूर्वी कधीही नव्हती इतक्या उत्कंठतेने हिंदुध्वजाची जाणीव आणि अखिल हिंदू मतास एका प्रबळ समेष्टीस संघटित करण्याची तीव्र आकांक्षा हिंदू संघटनाच्या महान आंदोलनाने उद्दीप्त करताच त्या अखिल संघटनांच्या दिव्य, भव्य नव ध्येयाचे मर्म व्यक्त करणारा हा अभिनव हिंदुध्वज प्रगट झाला. तेव्हांपासून त्याचा स्वीकार आणि स्वागत ठिकठिकाणी होत आले आहे. सन १९२९ मध्ये सुरतेला जे हिंदुमहासभेचे अधिवेशन झाले तेथेही त्या सभेचे वयोवृद्ध नि ज्ञानवृद्ध अध्यक्ष श्रीमान रामनंद चटर्जी यांच्या हस्ते हा हिंदू ध्वज जेव्हा उभारला गेला, तेव्हा त्या महासभेने उठून सभामंडप घडीभर हादरत राहील अशा जयजयकारात त्याचे स्वागत केले. त्यास जातीय उत्थापन आणि जातीय वंदना दिली.

हा हिंदुध्वज हा हिंदू जातीचेच तेवढे प्रतीक नसून हिंदू धर्माचेही प्रतीक असल्याने तो त्या धर्माच्या सर्वांगीण उदारतेइतकाच विस्तृत आहे. हिंदुधर्माच्या ध्येयाप्रमाणेच तोही "स भूमी विश्वतो वृत्वा अत्यतिष्टत् दशांगुलम्!" हिंदूच नव्हे तर उभी मानव जाती नास्तिकापासून आस्तिकापर्यंत, हॉटेंटॉटपासून हिंदूपर्यंत वर्ण - जाति - पंथ - निर्विशेष त्याच्या अमृतोपम शीतल छायेखाली समाविष्ट होऊन 'श्रेयः परम्' प्राप्त करू शकेल इतका तो विस्तृत आणि भव्य, उदात्त, उच्च आणि दिव्य आहे.

कारण लोकांचे धारण करतो तो धर्म, धारणांत धर्ममित्याहुः धर्मी धारयति प्रजाः! त्या धर्माची साध्ये दोन; अभ्युदय आणि निश्रेयस :- ऐहिक मुक्ती, पारलौकिक निश्रेयसाचे,

अतिंद्रिय आनंदाचे, परमार्थिक परम गंतव्याचे जे द्योतक या ध्वजावर अंकित केलेले आहे ते.

कुंडलिनी

हे होय. ती कोण्या वर्णाची वा जातीची मत्ता नसून मनुष्य मात्रांत अंतर्हित आहे. आपल्या पाठीच्या कण्यास मेरुदंड म्हणतात. त्याच्या दोन्ही बाजूस ज्ञानतंतूच्या बनलेल्या दोन नाड्या आहेत. त्याच इडा आणि पिंगला (The affarent and the efferent) होत. मेरुदंडांत इंग्रजी ८ च्या आकारासारख्या कण्यांची जी माळ आहे, तिच्यामधून तिसरी नाडी सुषुम्ना म्हणून जाते तिला (Cerabrospinal axis) असे काही इंग्रजी तज्ज्ञ संबोधित, इडा आणि पिंगला ह्या नाड्यांस संलग्न झालेली आपल्या ठिकठिकाणच्या ज्ञानतंतूंची जी उपकेंद्रे आहेत (Nerve Plexuses) त्यांनाच यौगिक भाषेत कमले म्हटले असावे. ह्यांची संख्या शाक्तांच्या कुंडलिनी योगांत बरीच दिलेली असली, तरी ती मुख्यत्वे सात आहेत. मूलाधार (Sacral plexus), स्वाधिष्ठान मणिपूर (Naval), अनाहत् विशुद्ध, आज्ञा, सहस्त्रार (Pineal gland where the spinal cord ends in a sort of ball floating in a fluid in the brain) मूलाधारांत सूप्त असणारी शक्ती, ती कुंडलिनी, योगध्यानाने जागृत होतांच प्रत्येक केंद्रातून वर चढत, अलौकिक सिद्धि आणि अनुभव उपभोगित सहस्त्राराच्या अंतिम केंद्रास पोचते आणि तिथे ती पोचताच साधकास एक अलौकिक अतिंद्रिय अगाध आनंद प्राप्त होतो. ह्याला योगी कैवल्यानंद म्हणतील, वज्रयानी महासुख म्हणतील, अद्‌वैती ब्रह्मानंद म्हणतील. भक्त प्रेमानंद म्हणतील. नास्तिक किंवा भौतिकभौतिक परिभाषा केवळ परमानंद - (An extacy) म्हणेल; पण हा अनुभव प्रत्येकास आलाच पाहिजे. मग त्याचा विश्वास एकाद्या विशिष्ट पैगंबरावर, अवतारावर, ग्रंथावर, पांथिक मतमतांतरावर असो वा नसो यास्तव आपल्या हिंदू धर्मातील चार्वाकपंथी लोकायतिकांसुद्धा यच्चयावत पंथाचा कुंडलिनी योगाविषयी मतभेद नाही. वैदिक, सनातनी, जैन, शीख, ब्राम्हो, आर्य इत्यादी झाडून साऱ्या धर्मपंथास कुंडलिनी योग मान्य आहे. कारण ते प्रत्यक्ष आणि प्रयोगात्मक शास्त्र आहे. केवळ शाब्दिक वा तार्किक असा एखादा मतवाद नाही.

ह्यास्तव हिंदुधर्माचे जे पहिले महान पारलौकिक ध्येय आहे, त्याचे द्योतक असे अति उत्तम चिन्ह कुंडलिनी हेच होऊ शकते. कारण ते हिंदुमात्रासच नव्हे तर मनुष्य मात्रास बुद्धिगम्य आहे. आनुभाव्य आहे. स्वस्तिक हा एक जातिविशिष्ट वा पंथाविशिष्ट संकेत आहे. त्यास बुद्धिगम्य स्पष्टीकरणाचा इतका जागतिक पाठिंबा नाही तीच स्थिती आपल्या दंशिक वा जातीय परिस्थितीपुरतेच विशिष्ट महत्व पावलेल्या गाय वा गणपति वा ग्रंथ इत्यादि प्रतिमांची होय. हिंदुधर्माचे महत् ध्येय

व्यक्त करण्यास तशा कोणत्याही केवळ सांकेतिक किंवा मतभेद क्लिष्ट किंवा मर्यादित चिन्हांपेक्षा ही कुंडलिनी परमेश्वराच्या स्वरुपाशी या प्रत्येक मनुष्यास लाभलेले निसर्गसिद्ध अतिंद्रिय, ही शक्ती, हे साधन हेच उत्कृष्ट द्योतक.

हिंदुधर्माची मुख्य प्रतिज्ञा, मुख्य वैशिष्ट, मुख्य ब्रीद, परमेश्वराचा साक्षात्कार, देवाशी प्रत्यक्ष परिचय, परमात्म्याशी आत्म्याची भेट किंवा आत्माच परमात्मपदास पोचणे हे होय. शक्तीचा शिवाशी जो हा संयोग तोच योग. म्हणूनच हिंदुधर्माचे आणि जातीचे पारलौकिक गंतव्य आणि जगतास पोचविण्याचा दैवी संदेश जर कोणच्या एका शब्दात स्पष्टपणे मत व्यक्त करता येणारा असेल, तर तो शब्द योग हाच होय. त्या योगाचे मुख्य प्रतीक कुंडलिनी. एतदर्थच आपल्या हिंदुधर्माचे आणि जातीचे प्रथम ध्येय जे निश्रेयस ते सुव्यक्त करण्याचे सामर्थ्य हिंदू ध्वजावर अंकीत झालेल्या या कुंडलिनीतच उत्कटपणे बसणारे आहे.

पारलौकिक दृष्टि क्षणभर कोणी बाजूस ठेवू इच्छिल, तरीही आपल्या हिंदू जातीने जगास जी अमूल्य ऐहिक दाने दिली आहेत, त्यात सर्वोत्कृष्ट दान जे आहे ते हे योगशास्त्र, एक वेळ तात्विक मतवादांस मतमतांची गडबड म्हणता येईल. पण योगास म्हणता येणार नाही. कारण योग ही भौतिक परिभाषेत आणि परिमाणांत व्यक्त करता येणारे एक प्रयोगात्मक प्रत्यक्ष आणि आनुभाव्य शास्त्र आहे. भौतिक दृष्टीने देखील मनुष्याच्या आत्मिक आणि मानसिकच नव्हे तर दैहिक शक्तीही किती आश्चर्यकारक उन्नत्ती करू शकतात, किती अद्भुत सिद्धी मिळवू शकतात आणि मन एक अनिर्वाच्य 'यंलब्धा चापर' लाभं मन्यते न ततोधिक' अशा आनंद (Extacy) उपभोगू शकते, हे सहस्रावधी वर्षाच्या अनवरत प्रयोगांनी शक्य आणि सिद्ध करून दाखविणारे हे योगशास्त्र आम्ही हिंदूनी परिणत केले आणि त्याची जागतिक संस्कृतीत अमूल्य भर टाकली ही गोष्ट केवढी गौरवाची आहे! तोच आमचा जातीय गौरव आमच्या जातीय ध्वजावर ही कुंडलिनी व्यक्त करीत राहील!

आपल्या हिंदुधर्माचे आणि जातीचे जे पारलौकिक ध्येय निःश्रेयस ते कुंडलिनीने अशा प्रकारे व्यक्त केल्यानंतर त्या धर्माचे जे ऐहिक साध्य अभ्युदय ते आपल्या ध्वजावर व्यक्त करण्यास अत्युकृष्ट चिन्ह म्हणजे.

कृपाण

हे असू शकणार. प्रत्यक्ष धर्म ही कृपाणाची दंडशक्ती आहे म्हणून सुरक्षित आहे. विशेषतः आपल्या हिंदू जातीच्या अवनतीस ह्या कृपाणाचे, ह्या शक्तीचे ह्या ऐहिक अभ्युदयाचे जे विस्मरण झाले, त्याकडे जे आम्ही अपराधी दुलर्क्ष केले तेच मुख्य कारण झालेले असल्याने ह्यापुढे असे दुलर्क्ष न करण्याचा आम्ही हिंदूंनी निर्धार केलेला आहे हे सर्व शत्रूंस आणि मित्रास बजावून सांगण्यासाठी आमच्या

हिंदुसंघटणाच्या ह्या महान ध्वजावर कृपाण अंकित झालेच पाहिजे. आमच्या धर्माच्या व्याख्येप्रमाणेच निश्रेयस आणि अभ्युदय, मुक्ती आणि भुक्ती ही त्याची दोन चरणे आहेत. परंतु दुर्दैवाने त्यापैकी अभ्युदयाकडे, भुक्तीकडे आणि ज्या साधनाने ती साध्य होणारी आहेत त्या शक्तीकडे आम्ही दुलर्क्ष केल्यामुळे आमचा धर्म एक पायी झाला, पंगु झाला. त्यायोगे समाजाचे ऐहिक आणि पारलौकिक धारण करण्याचे त्याचे कर्तव्य करण्यास तो त्या प्रमाणांत असमर्थ झाला. ती चूक आता यापुढे होऊ द्यावयाची नाही. यापुढे ज्या शक्तीने 'मिळती राज्ये' ती शक्ती, ती राष्ट्रशक्ती, ती शास्त्रशक्ती, ऐहिक भुक्तीची तलवार आम्ही आपल्या हातांतून कोण्या निष्क्रीय भंगड गुंगीलाच समाधी समजून तिच्या बेशुद्धीच्या निशेत गळू देणार नाही. ती कुंडलिनी हे कृपाण! ती मुक्ती, ही भुक्ती! ती शांती, ही शक्ती! तो योग, हा भोग! ते निश्रेयस, हा अभ्युदय! ती क्षमा, ही शांती, ती निवृत्ती! ही प्रवृत्ती, ते ध्येय ही धारणा! ती औपनिषदिक विद्या, ही औपनिषदिक अविद्या! तो योगेश्वर कृष्ण, हा धनुर्धारी पार्थ!! ती ज्ञानयोगाची कुंडलिनी हे कर्मयोगाचे कृपाण परित्राणाम् साधुनाम् विनाशायच दुष्कृताम्! ईशा वास्य मिदं सर्व यत्किंच जगत्या जगत् तेन त्यक्तेन भुंजीथाः' हाच आमच्या हिंदुध्वजाचा जागतिक संदेश आणि जातीय घोषणा ही कुंडलिनी आणि हे कृपाण करीत आहे.

त्या कृपाणाने ह्या शक्तीने प्राप्त होणारे राज्य, सामर्थ्य, धन, आततायी लोकांच्या कलंकाने दूषित होऊ नये म्हणून, 'तेन त्यक्तेन भुंजीथाः मागृधः कत्याचिद धनं' हे नीतीमत्तेचे सार सूत्र सदोदित सन्मुख असावे यास्तव या कृपाणाचा, ह्या हिंदुध्वजाच्या पृष्ठभूमीचा रंग

गैरिक अर्थात भगवा

आहे. हा रंग त्यागाचा आहे. साधुत्वाचा आहे. योगच नसेल, क्षेमच नसेल तर त्याग तरी कसला? म्हणून हे योगक्षेमाचे कृपाण हिंदू जातीने उपसले आहे. पण ते "आदानंही विसर्गाय स तो वारी मुच्चरिव" आम्ही स्वतंत्र होणार, शक्तीशाली होणार, मुक्त होणार, पण ते आम्हांसह अतरासही स्वतंत्र करण्यासाठी यास्तव आमच्या संपन्नतेचा ध्वज त्यागी आहे भगवा आहे. गैरिक आहे.

ज्या भगव्यावर एका बाजूस ॐकार युक्त कुंडलिनी आणि दुसऱ्या बाजूस कृपाण अंकीत आहे, त्या त्या हिंदुजातीच्या हिंदुध्वजाच्या संकेताचा हा गूढार्थ आहे, हे तात्त्विक रहस्य आहे या तात्त्विक रहस्याप्रमाणे त्या ध्वजाचे

ऐतिहासिक महत्व

हेही काही कमी नाही. कारण तो हिंदू जातीतील जे अनेक ध्वज आजवर प्रचलित आहेत, त्यांच्या परंपरेचाच विकास आहे, पूर्णता आहे. हिंदुजाती वर्गाला मुसलमानी

आक्रमणाच्या कालांत ज्या अत्यंत प्रबळ आंदोलनाने हिंदुसंघटनाचा यशस्वी पुरस्कार केला. त्या महाराष्ट्रीय हिंदुपदपादशाहीचा ध्वज भगवाच होता. तो ज्या राष्ट्रगुरूने राष्ट्रवीर शिवाजीस दिला, त्या समर्थ स्वामी रामदासांनी ज्या कार्याची एका ठिकाणी अशीच व्याख्या केली होती.

**सामर्थ्य आहे चळवळीचे। जो जो करील तयाचे**
**परंतु तेथे भगवंताचे। अधिष्ठान पाहिजे।।१।।**
**पहिले ते हरिकथा निरुपण। दुसरे ते राजकारण**
**तिसरे ते सावधपण। सर्व विषयी।।२।।**

महाराष्ट्रीय भगव्या झेंड्यात निगूढ असलेला हाच अर्थ ह्या हिंदुध्वजात प्रकट झालेला आहे. ही ॐकारयुक्त कुंडलिनी हीच ते भगवंताचे अधिष्ठान दर्शविते. ते मुख्य हरिकथेचे निरुपण करते आणि हे कृपाण--- हे तेच 'चळवळीचे सामर्थ्य' तेच, राजकारण, तेच सर्व विषयी सावधपण प्रकटविते. अर्थात त्या महान हिंदू साम्राज्याच्या पुरातन ध्वजाच्या त्या भगव्यांत समर्थांचा जो मूक संदेश अंतर्हित होता, त्याचीच प्रकट घोषणा हा हिंदुध्वज करीत आहे. ह्याहून त्यांत काही एक फरक नाही. महाराष्ट्रीय भगव्याप्रमाणे शिखांचे कृपाण हेही त्यावर अंकित असल्याने हिंदुजातीच्या दुसऱ्या महान संरक्षकाचीही, गुरू गोविंदा सिंगाचीही मुद्रा त्यावर अंकित आहे. गुरू गोविंद कटीस दोन खड्ग बांधीत आणि म्हणत हा खड्ग योगाचा आहे- हा भोगाचा आहे; हा शांतीचा, हा पुष्टीतुष्टीचा! तोच संदेश हा हिंदुध्वज घोषित आहे. तो योगाचा खड्गच, ही ह्या ध्वजावरील कुंडलिनी- तो भोगाचा खड्ग हे कृपाण!

त्याचप्रमाणे हा ॐकार, शिखांना, वैदिकांना, आर्यांना, ब्राह्मणांना, सनातनीयांना, सर्वांचाच महामंत्र आहे. ही कुंडलिनी--- ही जैन, बौद्ध, शैव शक्ती, चार्वाकांसुद्धा अखिल हिंदूंच्या, सर्वांच्या भूतकालीन- धार्मिक परंपरेची साक्ष आहे. हे कृपाण--- वंग, आंध्र, द्रवीड, गौड, रजपूत, गुरखा--- यच्चयावत् हिंदूंच्या राष्ट्रीय भवितव्यतेची हमी आहे!
सर्व प्रांतांच्या आणि पंथाच्या, जातिवर्ण निर्विशेष हिंदुमात्रास अत्यंत पूज्य असलेली आणि त्यांचे प्रतिनिधित्व करणारी हिंदुजातीच्या महान ध्येयाची घोषणा करणारी, भूतकालाच्या हितावह परंपरेस लवमात्र न सोडता हिंदू जातीच्या धार्मिक आणि राष्ट्रीय अशा महान भावी आकांक्षाना प्रकट आणि प्रस्फुरित करणारी आणि तरीही अखिल मनुष्य जातीसाठी प्रत्यक्ष बुद्धिवादाने, भौतिक शास्त्राच्या परिभाषेतही पटवून देता येणारी ही ॐकारयुक्त कुंडलिनी- कृपाणाची भव्य चिन्हे ज्या भगव्यावर अंकित आहेत, तो हा हिंदुध्वज देवकुलाच्या कोटिकोटि वीरांच्या प्रतापाने अंकित होत्साता, 'परित्राणाय साधूनाम विनाशायच दुष्कृताम्' अखिल मानुषकांचे परम मंगल साधीत या आध्रुव पृथ्वीवर सर्वत्र आणि सदोदित विजयी असो!!!

